अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागातील तांत्रिक अधिकारी, गट-ब (राजपत्रित) संवर्गात तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नतीने पदस्थापना देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन आदेश क्रमांक : पदोन्न -२०२२/प्र.क्र.२७२/ना.पु.-१५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २३ मार्च, २०२३.

**शासन आदेश**

सन २०२२-२३ या निवडसूची वर्षात अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अधिनस्त निरीक्षण अधिकारी/अधिक्षक/परिमंडळ अधिकारी/विभागीय गोदाम निरीक्षक या संवर्गातील खालील नमुद अधिकारी यांना तांत्रिक अधिकारी, गट ब (राजपत्रित) - वेतनश्रेणी S-१६- (रू. ४४९००-१४२४००) या संवर्गात या आदेशाद्वारे विहित अटी व शर्तीच्या अधिन राहून सक्षम प्राधिकारी यांचे मान्यतेने सेवाज्येष्ठतेनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नती देण्यात येत आहे. सदर अधिका-याची त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या ठिकाणी पदोन्नतीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | जात प्रवर्ग | सध्या कार्यरत ठिकाण | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. राजेश न.पुंजाल | अ.ज. | निरीक्षण अधिकारी, तह. कार्यालय, देवळी, जि. वर्धा. | उप आयुक्त (पुरवठा) कार्यालय, औरंगाबाद येथील तांत्रिक अधिकारी या रिक्त पदी. |

२. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.०४.०८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या निर्णयाच्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोटयातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय क्र.बीसीसी २०१८/प्रक्र.३६६/१६-ब, दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनां नुसार सदर मान्यता देण्यात येत आहे. तसेच, दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णय प्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून तसेच मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल मुळ याचिका क्र.६४८/२०२२ व मुळ याचिका क्र.१२५६/२०२२, मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपिठ नागपूर येथे दाखल मुळ अर्ज क्र. १०९४/२०२२ या न्यायालयीन प्रकरणांमधील अंतिम निर्णयाच्या अधिन राहून सदर पदोन्नत्या देण्यात येत आहेत.

३. सदर अधिका-याना तांत्रिक अधिकारी पदावरील तात्पुरती पदोन्नती खालील अटीं-शर्तीच्या अधीन राहून देण्यात येत आहे-

१) सदर पदोन्नती तांत्रिक अधिकारी पदाची २७.१०.२०२२ रोजीची दि.०१.०१.२०२२ ची स्थिती दर्शविणारी अंतिम ज्येष्ठता यादी विचारात घेऊन देण्यात आली आहे.

२) सदर पदोन्नती तात्पुरत्या स्वरूपात असून सदर पदावर संबंधीत अधिकाऱ्याचा कायमस्वरूपी धारणाधिकार राहणार नाही.

३) सन २०२२-२३ या निवडसूची वर्षाकरीता पात्र अधिका-याची निवडसूची तात्पुरत्या स्वरूपाची असून तांत्रिक अधिकारी पदावरील पदोन्नत्या या तात्पुरत्या स्वरूपाच्या आहेत. परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमित पदाचा व सेवा ज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

४) संबंधित अधिका-यानी तांत्रिक अधिकारी पदावरील तात्पुरती पदोन्नती न स्वीकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.एसआरव्ही-२०१५/ प्र.क्र.३०३/का.१२, दि.१२/०९/२०१६ अन्वये त्यांचे नाव सन २०२२-२३च्या निवडसूचीतून काढून टाकण्यात येईल व पुढील दोन वर्षी होणाऱ्या निवडसूचीमध्ये त्यांच्या नावाचा विचार न करता तिसऱ्या वर्षाच्या निवडसूचीत तांत्रिक अधिकारी पदावरील तात्पुरत्या पदोन्नतीसाठी त्यांची पात्रता तपासण्यात येईल.

५) सदर अधिकाऱ्याची तांत्रिक अधिकारी पदावरील तात्पुरती पदोन्नती ही सदर अधिकाऱ्याविरूध्द प्रस्तुत आदेशाच्या दिनांकापर्यंत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरू झालेली नाही वा प्रस्तावित नाही या धारणेच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

६) सदर आदेश तात्काळ अंमलात येत असून अधिका-याना दर्शविण्यात आलेल्या पदावर तात्काळ रूजू होण्यासाठी ते धारण करीत असलेल्या पदावरून या आदेशान्वये एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे.

७) सदर अधिकारी त्यांना अनुज्ञेय असलेल्या रुजू कालावधीत पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास त्यांचेविरुद्ध सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.१८६/१६/कार्यासन १४, दिनांक २३ डिसेंबर २०१६ मधील तरतुदींनुसार शिस्तभंगविषयक कार्यवाही करण्यात येईल.

८) सदर तात्पुरत्या पदोन्नतीच्या अनुषंगाने पदस्थापनेचे आदेश प्राप्त झाल्यापासून संबंधित अधिकाऱ्याना शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करू नये.

४. संबंधित उप आयुक्त (पुरवठा) यांनी सदर आदेशाची तात्काळ अंमलबजावणी करून उक्त नमूद अधिकाऱ्यांना पदस्थापनेच्या पदावर तात्काळ रूजू करून घ्यावे व अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२३२०२८०८०४०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by GAJANAN RAMDAS DESHMUKH
Date: 2023.03.23 20:32:50 +05'30'

**( गजानन रा. देशमुख )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

श्री. राजेश न. पुंजाल, निरीक्षण अधिकारी, तह. कार्यालय, देवळी, जि. वर्धा ( उप आयुक्त (पुरवठा), नागपूर विभाग, नागपूर यांच्यामार्फत)

**प्रत:**

१. अपर मुख्य सचिव, (महसूल) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. विभागीय आयुक्त, नागपूर/औरंगाबाद.
३. मा. मंत्री ( अनापु व ग्रासं ) यांचे खाजगी सचिव.
४. नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई.
५. उप आयुक्त ( पुरवठा ), नागपूर/ औरंगाबाद.
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१ व २ ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ), मुंबई व नागपूर.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, वर्धा/ औरंगाबाद.
८. सचिव, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय यांचे स्वीय्य सहाय्यक.
९. विभागातील सर्व कार्यासने.
१०. निवडनस्ती/ना.पु.-१५.